लाचलुचपत प्रतिबंधक विभागामार्फत बंद करण्यात आलेल्या चौकशीच्या अनुषंगाने दिनांक २३/०९/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेले पाटबंधारे प्रकल्पांच्या निविदा विखंडनाचे आदेश कोकण प्रदेशातील शिरशिंगे, शाई, सुसरी, चणेरा, जामदा व काळ या प्रकल्पांपुरते रद्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : एसीबी-२०२०/प्र.क्र.१२९/खारभूमी**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २२ डिसेंबर, २०२१**

पहावे :-

१) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक एसीबी-२०१६/(प्र.क्र.१२५/१६)/ खारभूमी, दि.२३.०९.२०१६.
२) कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे या कार्यालयाचे क्र. कोंपाविम/तां-१/१२ प्रकल्प एसीबी/ १७८१/ सन २०२०, दिनांक ३०.०७.२०२० रोजीचे पत्र व सहपत्र.
३) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडील रिट याचिका क्र.१७५५/२०१७, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१२३६/२०२१, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.३०३८/२०२०, सिव्हिल ॲप्लिकेशन क्र.२९५६/२०१६, रिट याचिका क्र.१७५६/२०१७, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१२३८/२०२१, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.३०३४/२०२०, सिव्हिल ॲप्लिकेशन क्र.२९५९/२०१६, रिट याचिका क्र.१७५८/२०१७, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१२३७/२०२१, सिव्हिल ॲप्लिकेशन क्र.२९६०/२०१६, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.२८७४/२०१९, रिट याचिका क्र.१३४८६/२०१६, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१२३३/२०२१, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.३०४२/२०२०, रिट याचिका क्र.१७५७/२०१७, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१२३९/२०२१, सिव्हिल ॲप्लिकेशन क्र.२९५७/२०१६, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.३०३७/२०२०, रिट याचिका क्र.८४२९/२०१५, इंटेरिम ॲप्लिकेशन क्र.१०४८८/२०२१ तसेच मा.सर्वोच्च न्यायालयाकडील एसएलपी क्र.१९१५१/२०१८, पीआयएल क्र.६३/२०१२ मधील सुनावणी व निर्देश तसेच मा.उच्च न्यायालयाचा दिनांक ०८/०६/२०२१ चा निकाल,

प्रस्तावना :-

गृह विभागाच्या पत्र क्रमांक एसीबी -०८१४/प्र.क्र.७११/पोल-२ दिनांक १३.१२.२०१४ अन्वये कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या अखत्यारीतील पाटबंधारे प्रकल्पास मंजुरी देताना झालेल्या कथीत गैरप्रकाराची उघड चौकशी करणेबाबतचे आदेश महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई यांना देण्यात आले होते. त्याअनुषंगाने लाचलूचपत प्रतिबंधक विभागामार्फत कोकणातील बाळगंगा, काळू, शिरसिंगे, गडगडी, शीळ, शाई, सुसरी, गडनदी, कोंडाणे, चणेरा, जामदा, काळ (जलविद्युत) या १२ प्रकल्पांची उघड चौकशी सुरू झाली.

उपरोक्त चौकशी सुरु झाल्यानंतर सदरच्या प्रकल्पांची कामे संशयास्पद असल्याने या प्रकल्पांच्या संदर्भात निविदा विखंडित करण्यासंदर्भात प्रस्ताव मा. मंत्रीमंडळ बैठकीत दिनांक ३० ऑगस्ट, २०१६ अन्वये सादर करण्यात आला होता. या बैठकीतील निर्णयानुसार दिनांक २३.०९.२०१६ च्या शासन निर्णया अन्वये प्रकल्पांची निविदा विखंडित करण्याबाबतचे निर्देश देण्यात आले होते.

त्यानुसार कंत्राटदाराच्या निविदा विखंडनाबाबतची नोटीस निविदा कलम १५ (१) अन्वये प्रकल्पाशी संबंधित कार्यकारी अभियंता यांनी पुढील दिनांकास निर्गमित केले आहेत,

चणेरा प्रकल्प दिनांक ३०.०७.२०१५,जामदा प्रकल्प दिनांक ०३.११.२०१६, शाई प्रकल्प दिनांक ०८.११.२०१६, सुसरी प्रकल्प दिनांक ०८.११.२०१६, शिरसिंगे प्रकल्प दिनांक ०९.११.२०१६, काळ प्रकल्प दिनांक २३.११.२०१६.

विखंडनाची नोटीस निर्गमित केल्यानंतर त्या विरोधात संबंधित कंत्राटदाराने मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका दाखल केल्या व त्यावर मा. उच्च न्यायालयाने विखंडानाच्या नोटीसींना स्थगीती दिली तसेच नवीन कंत्राटदाराला काम देण्यास मनाई करण्यात आली होती. त्यामुळे प्रकल्पांची कामे न्यायीक प्रक्रीयेत असल्याने ठप्प झाली होती.

लाचलूचपत प्रतिबंधक विभागाने उघड चौकशी केल्यावर त्याचा तपास अहवाल पुढील दिनांकास शासनास सादर केला,

चणेरा प्रकल्प दिनांक ३१.०८.२०१९, सुसरी प्रकल्प दिनांक ०४.११.२०१९, काळ प्रकल्प दिनांक १५.११.२०१९, जामदा प्रकल्प दिनांक २०.११.२०१९, शिरसिंगे प्रकल्प दिनांक २०.११.२०१९ व शाई प्रकल्प दिनांक २६.११.२०१९.

त्यानंतर लाचलूचपत प्रतिबंधक विभागाने दिनांक १९.०६.२०२० च्या पत्रान्वये सदर प्रकल्पासंबंधित उपलब्ध कागदपत्रे व पुराव्याच्या आधारे फौजदारी कार्यवाही करणे योग्य व सबळ बाबी आढळून न आल्याने सद्यस्थितीत या प्रकल्पाच्या चौकश्या बंद करण्यात येत आहेत, असे कळविले आहे.

लाचलूचपत प्रतिबंधक विभागाने चौकशीची कार्यवाही बंद केल्यानंतर कोकण पाटबंधारे विकास महामंडळाने दिनांक ३०.०७.२०२० च्या पत्रान्वये याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला. या संदर्भात मा. मुख्यमंत्री यांनी दिनांक १२.०१.२०२१ च्या बैठकीत याबाबतचा उचित प्रस्ताव मा. मंत्रीमंडळ समितीसमोर सादर करण्याचे निर्देश दिले होते.

कोकण प्रदेशातील सदर प्रकल्प प्रामुख्याने मुंबई महानगर क्षेत्र,ठाणे,अंबरनाथ,बदलापूर,सिडको, नवी मुंबई इ. क्षेत्रासाठी आहेत. या भागातील वाढती लोकसंख्या, शहरीकरण व औद्योगिकीकरण यासाठी पाणी पुरवठयाची गरज आहे. पाणीपुरवठा प्रकल्प रखडल्याने विकासाची गती मंदावते व सामान्य जनतेला मोठयाप्रमाणात अडचणींना सामोरे जावे लागते. सदरचे ६ प्रकल्प गेल्या ५-६ वर्षापासून बंद अवस्थेत आहेत. या प्रकल्पांच्या किंमतीत सतत वाढ होत आहे. शासनाने सदर प्रकल्पांसाठी गुंतवणूक केलेला मोठा निधी पडून आहे. कोकणातील पूराच्या परिस्थीतीवर नियंत्रणाकरीता सदर प्रकल्प पूर्ण करणे आवश्यक आहे. याचा विचार करुन कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या वतीने मा. उच्च न्यायालयात सदर अंतरीम स्थगिती आदेश उठविणेबाबत तसेच निविदा विखंडनासंदर्भातील उचित निर्णय घेण्यास महामंडळाला मुभा मिळावी, याबाबतचा विशेष विनंती अर्ज कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या ८० व्या बैठकीतील ठरावाच्या अनुषंगाने दाखल केला होता. त्यावर मा. उच्च न्यायालयाने सुनावणी घेवून दि ०८.०६.२०२१ रोजी स्थगिती आदेश रद्द करुन निविदा विखंडनासंदर्भातील अंतिम निर्णय घेण्यास कोकण पाटबंधारे विकास महामंडळाला मुभा दिली आहे.

मा. उच्च न्यायालयाच्या दिनांक ०८.०६.२०२१ च्या आदेशाच्या अनुषंगाने व महामंडळाच्या ८१ व्या नियामक मंडळ ठराव दि ३०.०६.२०२१ व ०७.०७.२०२१ नुसार प्रकल्पाची कामे पूर्ण करण्यासाठी तसेच निविदा विखंडन रद्द करणे अथवा नव्याने निविदा काढणे या बाबतचा प्रस्ताव निर्णयार्थ मा. मंत्रीमंडळासमोर सादर करण्यात आला होता. मा. मंत्रीमंडळ समितीच्या बैठकीत याबाबत सविस्तर चर्चा करण्यात आली व खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय :-**

मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक १०.११.२०२१ रोजी संपन्न झालेल्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार कोकण विभागातील शिरशिंगे, शाई, सुसरी, चणेरा, जामदा व काळ या ६ प्रकल्पांच्या निविदेप्रक्रियेत कथित गैरप्रकाराची लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून बंद करण्यात आलेल्या चौकशीच्या अनुषंगाने या प्रकरणी शासन पुढील प्रमाणे आदेश देत आहे.

१) मा.उच्च न्यायालयाने याचिका क्रमांक २०१७ च्या १७५५, १७५६, १७५८, १३४८६, १७५७ व २०१५ च्या ८४२९ शी निगडीत दिनांक ८.६.२०२१ रोजी दिलेल्या अंतिम आदेशाची यथोचित अंमलबजावणी कोकण पाटबंधारे विकास महामंडळाला शक्य व्हावी, याकरीता मा.मंत्रीपरिषदेने शिरशिंगे, शाई, सुसरी, चणेरा, जामदा व काळ या सहा प्रकल्पांशी संबंधित यापूर्वी दिनांक ३०.८.२०१६ रोजी घेतलेला निर्णय रद्द करण्यात येत असून त्या अनुषंगाने जलसंपदा विभागाच्या दिनांक २३.०९.२०१६ रोजीचा निर्णय वरील सहा प्रकल्पा पुरता अधिक्रमित करण्यात येत आहे.

२) उपरोक्त निर्णय खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून घेण्यात येत आहे:-

अ) वरील प्रकल्पांच्या कराराबाबत जी विखंडन नोटीस Indian Contract Act, १८७२ व करारातील तरतूदी याचा परामर्श घेऊन देण्यात आली होती, त्या नोटीसीवर अंतिम निर्णय करताना कोकण पाटबंधारे विकास महामंडळाच्या नोटीस देणाऱ्या सक्षम स्तरावरील अधिकारी यांनी स्वयंस्पष्ट आदेश (speaking order) पारित करावेत.

ब) सदर निर्णय म्हणजे प्रकल्प कार्यान्वित करण्याच्या विविध टप्प्यांवर झालेल्या अनियमिततेस मान्यता गृहित धरता येणार नाही.

क) या प्रकल्पाबाबत चालू असलेल्या अथवा प्रस्तावित विभागीय चौकशीची कार्यवाही पूढे चालू राहिल. सदर निर्णयामुळे विभागीय चौकशीस बाधा पोहोचणार नाही.

ड) सदर निविदेसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यता व सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन किंवा विहित कार्यपध्दतीनूसार अतिरिक्त दायित्वाच्या मंजूरी शिवाय निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

ई) सदर निविदांची कामे प्राधान्याने पूर्ण करुन पाणीसाठयाचा जास्तीत जास्त लाभ होईल अशाप्रकारे उर्वरित कामांचे योग्य नियोजन करुन अंमलबजावणीची जबाबदारी क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील.

फ) केंद्र शासनाच्या वन व पर्यावरण विभागाने वन (संवर्धन) अधिनियम १९८० च्या अंमलबजावणीसाठी दिनांक २८.३.२०१९ रोजी निर्गमित केलेल्या Handbook of guidelines च्या अनुच्छेद १.१४ याचे पालन करणे बंधनकारक राहील. तसेच वन व पर्यावरण विभागाची अंतिम मान्यता मिळण्यापूर्वीच्या कालावधीसाठी कंत्राटदारास कुठलेही विनावापर यंत्र सामग्री / विनावापर मनुष्यबळ अथवा इतर कारणासाठी दावा (Claim) करता येणार नाही व असे दावे अनुज्ञेय असणार नाहीत.

ग) सदर आदेशाची कार्यवाही पीआयएल क्र. ६३/ २०१२ च्या अनुषंगाने भविष्यातील मा. उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात यावी.

**३)** दिनांक ३०.०८.२०१६ रोजी मा. मंत्रीपरिषदेने घेतलेल्या निर्णयास अनुसरून जलसंपदा विभागाचा दिनांक २३.०९.२०१६ रोजीचा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत असल्यामुळे, त्या शासन निर्णयाच्या आधारावर निविदा कलम १५ प्रमाणे सक्षम स्तरावरुन दिलेल्या निविदा विखंडनाच्या नोटिसीबाबत वरील २ (अ) प्रमाणे त्याच स्तरावरुन त्वरीत कार्यवाही करावी.

सदर आदेश मा. मंत्रीमंडळाच्या दिनांक १०/११/२०२१ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील विषय क्र. ६ अन्वये घेतलेल्या निर्णयास अनुसरुन तसेच विधी व न्याय विभाग अनौ.संदर्भ क्र. RI.No.474/Civil, dated 14.12.2021, नियोजन विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२४३/२०२१/१४३३, दिनांक १४/१२/२०२१ आणि वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.४५६/व्यय-१२, दिनांक १५/१२/२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११२२२१३०१०७३९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2bf9216e9c82a387001366ade405f96dced8f883099a0df6eda6dcc4a3cecb0, serialNumber=64cd9fc7921db221846e464a04d2971a520aa1ed7e728a92a64c735ef2ea7cc9, cn=Vaijnath Manmathappa Chille
Date: 2021.12.22 13:01:48 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रतिलिपी :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (जलसंपदा व लाभक्षेत्र विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा, महाराष्ट्र यांचे स्वीय सहायक, विधान भवन, मुंबई
७. सर्व विधानमंडळ सदस्य
८. मुख्य सचिव, यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९. अ.मु.स.(वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०. अ.मु.स.(नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई
१२. सचिव (लाक्षेवि), यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव (प्रकल्प समन्वय), यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर

१५. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
१६. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१७. मु.अ.( दवप्र) व स.स., यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
१९. खारभूमी कार्यासन संग्रहार्थ